**धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-२ व ३ अंतर्गत समाविष्ट धरणांच्या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०२५/प्र.क्र.१७/सिंव्य (कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च,२०२५.

<u>संदर्भ</u> :- १) प्रकल्प संचालक DRIP तथा अधिक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, नाशिक यांचे पत्र क्र.O.No./SPMU(DRIP)/TB-७/(८८/२०२०)/३६७/२०२०, दि.०६/०८/२०२०.
२) जल शक्ती मंत्री, भारत सरकार यांचे पत्र क्र.DO No.T-२००८३(११)/१/२०२०-C(DSO)/१०३०, दि.०२/०९/२०२०.
३) जागतिक बँकेचे पत्र व प्रकल्प मूल्यमापन (Project Appraisal Document), दि.२१/१०/२०२०.
४) Agreed Minutes of Negotiations, Dt.10/11/2020 between GoM & IBRD.
५) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. ड्रीप-२०२१/१७८/२०(भा-२)(अ)/सिंव्य(कामे), दि.१२/०२/२०२१.
६) प्रकल्प संचालक DRIP तथा अधिक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, नाशिक यांचे पत्र क्र. राधसुसं/धसुक/३१/सन २०२५, दि.१३/०१/२०२५
७) मुख्य अभियंता (बांध सुरक्षा संगठन), जलशक्ती मंत्रालय यांचे दि.१३/०१/२०२५ रोजीचे पत्र.
८) दि. १७ मार्च, २०२५ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीचे इतिवृत्त.

<u>प्रस्तावना :-</u>

धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-३ हा केंद्र शासन पुरस्कृत जागतिक बँकेच्या अर्थ सहाय्याने हाती घेतलेला प्रकल्प आहे. सदर प्रकल्पाचा मुख्य उद्देश हा देशातील निवडक धरणांच्या सुरक्षिततेमध्ये तसेच परिचालन कामगिरीत सुधारणा करताना संबंधित संस्थांचे बळकटीकरण करुन योजनाबद्ध पद्धतीने व्यवस्थापन करणे व धरणांचे परिचालन व देखभाल यामध्ये सातत्यता राखणे, हा आहे. या प्रकल्पामध्ये महाराष्ट्र सहभागी झाला आहे. या प्रकल्पावर होणा-या खर्चाच्या ७० टक्के रक्कम जागतिक बँकेकडून प्रतिपूर्तीच्या स्वरुपात कर्ज रुपाने उपलब्ध होणार आहे.

केंद्र शासनाने दि.०७/०३/२०१९ रोजीच्या पत्रान्वये ड्रीप टप्पा -२ व ३ अंतर्गत महाराष्ट्र राज्यास बांधकामे व इतर घटकांकरीता एकूण ₹९४०.०० कोटीची तरतूद (Budgetary Provision) मंजूर असल्याचे कळविले आहे. महाराष्ट्र राज्य हे सर्वसाधारण प्रवर्गातील राज्य असल्याने ₹६५८ कोटी (७०%) रक्कमेपैकी प्रत्येकी ३५% रक्कम जागतिक बँक व Asian Infrastructure Investment Bank (AIIB) यांचेकडून कर्ज स्वरुपात उपलब्ध होणार असून उर्वरित रक्कम ₹२८२ कोटी (३०%) राज्य शासनाच्या निधीतून खर्च करावी लागणार आहे.

दि.०४/०८/२०२१ रोजी जागतिक बँकेसमवेत Project Agreement आणि Loan Agreement अंतिम करण्यात आले आहेत. तसेच त्याअनुषंगाने राज्याचे Legal opinion दि.०७ सप्टेंबर, २०२१ मध्ये केंद्र शासनास सादर करण्यात आले आहे. दि.१२/१०/२०२१ रोजी IBRD यांचे समवेत झालेले Loan Agreement व Project Agreement लागू (effective) झाले आहे.

दि.१९/०५/२०२२ रोजी Asian Infrastructure Investment Bank (AIIB) समवेत Project Agreement आणि Loan Agreement अंतिम करण्यात आले आहेत. तसेच त्याअनुषंगाने राज्याचे Legal opinion दि.१७ ऑगस्ट, २०२२ मध्ये केंद्र शासनास सादर करण्यात आले आहे. दि.२९/१२/२०२२ रोजी AIIB यांचे समवेत झालेले Loan Agreement व Project Agreement लागू (effective) झाले आहे.

दि.१३/०१/२०२१ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता प्राप्त झाल्यानुसार धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-२ अंतर्गत समाविष्ट १२ धरणांच्या पुनर्स्थापना व सुधारणा कामांना संस्था बळकटीकरण व प्रकल्प व्यवस्थापन या दोन घटकांसह ₹६२४.०० कोटी किंमतीस जलसंपदा विभाग, शासन निर्णय दि.१२/०२/२०२१ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर १२ कामांपैकी भातसा व डिंभे धरणे वगळण्यात आल्यामुळे व इतर धरणांच्या कामांच्या निविदा निश्चितीनंतर झालेल्या बदलामुळे तसेच टप्पा-२ मध्ये नवीन सारंगखेडा धरणाचा समावेश केल्याने धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-२ अंतर्गत प्रशासकीय मान्यता किंमतीत बदल झाला आहे.

केंद्र शासनाच्या दि.०८/०७/२०२४ रोजीच्या पत्रान्वये राज्यास टप्पा-२ करिता ₹३७९.०० कोटी व टप्पा-३ करिता उर्वरित ₹५६१.०० कोटी तरतूद मंजूर आहे. तसेच धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-३ चा प्रस्तावित कालावधी एप्रिल,२०२५ ते मार्च,२०३१ असा आहे.

मा.मंत्रीमंडळाचा दि.३०/०७/२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-२ व ३ योजनेत राज्याने सहभागी होण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने जलसंपदा विभागाने दि.१३/०९/२०१९ अन्वये सविस्तर शासन निर्णय निर्गमित केला आहे.

केंद्र शासनाने दि.१३/०१/२०२५ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-३ हा एप्रिल, २०२५ पासून प्रस्तावित असल्याने त्यासाठी पूर्वतयारीचा भाग म्हणून टप्पा-३ अंतर्गत प्रस्तावित करावयाचे प्रकल्प अंतिम करुन त्यांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक ठरले आहे. या पार्श्वभूमीवर शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-२ व ३ अंतर्गत प्रस्तावित धरण पुनर्स्थापना व सुधारणा कामे, संस्था बळकटीकरण, प्रकल्प व्यवस्थापन आणि Innovative Financing for sustainable operation & maintenance or dams या घटकांसहित ₹९४०.०० कोटी किंमतीस पुढील तपशीलानुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **धरणाचे नांव** | **प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमत (₹ कोटीत)** | **सुधारित किंमत (₹ कोटीत)** | **वाढ/घट (₹ कोटीत)** | **शेरा** |
|---|---|---|---|---|---|
| i) | **धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-२** | | | | |
| **घटक अ:-** धरणे व त्यांच्या विविध उपांगाची पुनर्स्थापना व सुधारणा | | | | | |
| १ | भातसा | २००.६६ | निरंक | (-) २००.६६ | वगळणे प्रस्तावित |
| २ | डिंभे | ७२.९२ | निरंक | (-) ७२.९२ | वगळणे प्रस्तावित |
| ३ | भंडारदरा | ७३.७९ | ५.८३ | (-) ६७.९६ | |
| ४ | वान | १०.०६ | ६.२८ | (-) ३.७८ | |
| ५ | ज्ञानगंगा | ५.५० | ५.८७ | (+)०.३७ | |
| ६ | सपन | १५.१० | ३.८१ | (-) ११.२९ | |
| ७ | कोयना | २२.७० | २४.४० | (+)१.७० | |
| ८ | कन्हेर | १०.९१ | ११.०८ | (+)०.१७ | |
| ९ | अप्पर वर्धा | १०.४९ | ९.१६ | (-) १.३३ | |
| १० | मांजरा | ५०.६१ | २८.४६ | (-) २२.१५ | |
| ११ | जायकवाडी | ८८.५७ | ९०.७७ | (+)२.२० | |
| १२ | लोअर वेण्णा(वडगाव) | ५९.४४ | ४५.०३ | (-) १४.४१ | |
| १३ | सारंगखेडा | ०.०० | १४०.०० | (+)१४०.०० | ड्रिप-२ अंतर्गत नव्याने समावेश प्रस्तावित |
| **घटक ब:-**संस्था बळकटीकरण | | २.५० | ३.०० | (+)०.५० | |
| **घटक क:-** प्रकल्प व्यवस्थापन | | ०.७५ | ५.३१ | (+) ४.५६ | |
| | **(अ+ब+क+) एकुण** | **६२४.००** | **३७९.००** | **(-) २४५.००** | |
| **अ.क्र** | **प्रकल्पाचे नाव** | **प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमत** | **अंदाजित किंमत** | **वाढ/घट** | **शेरा** |
| ii) | **धरण पुनर्स्थापना व सुधारणा प्रकल्प टप्पा-३** | | | | |
| **घटक अ) :- धरण पुनर्स्थापना कामे** | | | | | |
| १ | भंडारदरा (Part-B) | --- | ३००.०० | --- | ड्रिप-३ अंतर्गत नव्याने समावेश प्रस्तावित |
| २ | अप्पर वैतरणा | --- | १०२.०० | --- | ड्रिप-३ अंतर्गत नव्याने समावेश प्रस्तावित |
| ३ | भाटघर | --- | ९०.०० | --- | ड्रिप-३ अंतर्गत नव्याने समावेश प्रस्तावित |

| अ. क्र. | धरणाचे नांव | प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमत (₹ कोटीत) | सुधारित किंमत (₹ कोटीत) | वाढ/घट (₹ कोटीत) | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| ४ | सपन (Part-B) | --- | ४२.०० | --- | ड्रिप-३ अंतर्गत नव्याने समावेश प्रस्तावित |
| | एकूण अ) | --- | ५३४.०० | --- | |
| **ब)** | संस्था बळकटीकरण | --- | ९.०० | --- | |
| **क)** | प्रकल्प व्यवस्थापन | --- | ९.०० | --- | |
| **ड)** | Innovative Financing for sustainable operation & maintenance of dams | --- | ९.०० | --- | ड्रिप-३ अंतर्गत नव्याने समावेश प्रस्तावित |
| | | **(अ+ब+क+ड) एकूण** | **५६१.००** | --- | |
| | | **एकूण टप्पा-२ व टप्पा-३** | **९४०.००** | --- | |

प्रकल्पनिहाय लेखाशीर्ष पुढीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | लेखाशीर्ष | |
|---|---|---|---|
| | | जागतिक बँक हिस्सा | राज्य शासन हिस्सा |
| अ | पुनर्स्थापना व सुधारणा कामे | | |
| १ | लोअर वेण्णा(वडगाव) | २७०० ००३८ | २७०० ०१०९ |
| २ | वान | | |
| ३ | अप्पर वर्धा | | |
| ४ | सपन | २७०१ C१०४ | २७०१ C१७८ |
| ५ | ज्ञानगंगा | | |
| ६ | कोयना | २७०० ००११ | २७०० ००८३ |
| ७ | कन्हेर | | |
| ८ | भाटघर | | |
| ९ | मांजरा | २७०० ००६५ | २७०० ०१३६ |
| १० | जायकवाडी | | |
| ११ | भंडारदरा | २७०० ००७४ | २७०० ०१४५ |
| १२ | सारंगखेडा | २७०१ C१२२ | २७०१ C१९६ |
| १३ | अप्पर वैतरणा | २७०० ००५६ | २७०० ०१२७ |
| **ब)** | संस्था बळकटीकरण | २७०० ००२९ | २७०० ००९२ |
| **क)** | प्रकल्प व्यवस्थापन | | |
| **ड)** | Innovative Financing for sustainable operation & maintenance of dams | | |

२. ड्रिप-२ व ३या प्रकल्पांतर्गत कामांना तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी अंदाजपत्रकांची छाननी राज्य तांत्रिक सल्लागार समितीकडून करुन त्यांची सहमती प्राप्त करावी. अशा अंदाजपत्रकांना जागतिक बँकेने सहमती दिलेल्या किंमतीच्या तसेच या शासन निर्णयातील किंमतीच्या मर्यादेत तांत्रिक मान्यता संबंधित मुख्य अभियंतांनी द्यावी.

३. सदर शासन निर्णयास नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२६/२५/१४३४, दि.२०/०२/२०२५ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१०६/२०२५/व्यय-१२, दि.०७/०३/२०२५ अन्वये सहमती प्राप्त आहे.

४. सदर शासन निर्णय हा मा.मंत्रिमंडळाने दि.१७/०३/२०२५ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत प्रदान केलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१८१६५१३२५९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2025.03.18 16:52:24 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
४) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव.
५) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
८) मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
९) मा.मंत्री जलसंपदा (विदर्भ, कोकण व तापी पाटबंधारे महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
१०) मा. मंत्री, जलसंपदा ( गोदावरी व कृष्णा खोरे विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव.
११) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर
१३) अ.मु.स (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अ.मु.स (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) अ.मु.स (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सचिव, (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९) महासंचालक, मेरी नाशिक.
२०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
२१) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
२२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२३) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
२४) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
२५) मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६) नोडल अधिकारी (DRIP), राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्ष तथा मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक.
२७) आंतर वित्त सल्लागार तथा सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८) उप सचिव (सिंचन व्यवस्थापन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९) प्रकल्प संचालक (DRIP), राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्ष तथा अधीक्षक अभियंता, राज्य धरण सुरक्षितता संघटना, नाशिक.
३०) निवडनस्ती कार्यासन सिंव्य (कामे).